भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील "उपअभियंता (यांत्रिकी)" संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या- २०२०

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-०२२०/प्र.क्र.७८/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुबई ४०० ००१
तारीख: ०१ ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या तरतुदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/कार्या १२, दिनांक ०७/०७/२०२० व दिनांक २३/०७/२०२० मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील "उपअभियंता (यांत्रिकी)" संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्याप्रमाणे विनंती बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपअभियंता (यांत्रिकी) यांचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. एम.व्ही. पाटील | देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, बुलढाणा. | देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, जळगाव. |
| २ | श्री. डी.एम. बिराजदार | देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, अहमदनगर. | देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, पुणे. |
| ३ | श्री. एम.ए. चव्हाण. | यांत्रिकी उपविभाग, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, रायगड (अलिबाग). | संचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. |

| अ.क्र. | उपअभियंता (यांत्रिकी) यांचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ४ | श्री. एन.एल. लोणकर. | यांत्रिकी उपविभाग, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, अकोला. | संचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. |
| ५ | श्री. ए.के. पाटील. | यांत्रिकी उपविभाग, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, वाशीम. | देखभाल दुरुस्ती, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा. |

बदली आदेशाची तात्काळ व कार्यक्षमरित्या अंमलबजावणी होण्याकरीता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे:-

१. उपरोक्त नमूद उपअभियंता (यांत्रिकी) यांना या आदेशाच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक ०१/१०/२०२० (म.नं.) पासून रकाना क्रमांक ३ मध्ये नमूद कार्यालयातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून, संबंधित कार्यालयाने नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

२. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी रकाना क्रमांक ४ मध्ये नमूद कार्यालयात तात्काळ रुजू होऊन तसा अहवाल संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्यामार्फत शासनाकडे विनाविलंब सादर करावा. बदली झालेले अधिकारी हे बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुखास व आस्थापना अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल.

३. सदरहू आदेशान्वये पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे. पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास अथवा बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्याची नोंद घेण्यात यावी. तसेच सदर कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम क्रमांक ३ (तीन) व नियम क्रमांक २३ चा भंग करणारी असल्यामुळे असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व अधिकाऱ्यांचे दिनांक ०१/१०/२०२० पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. दिनांक ०२/१०/२०२० पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या कार्यालयात हजर झाल्यानंतर बदली नंतरच्या कार्यालयाने काढावे व तसा अहवाल शासनास सादर करावा. दिनांक ०२/१०/२०२० पासूनचे वेतन बदलीपुर्वी कार्यरत असलेल्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल, अशा सूचना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुखांना देण्यात येत आहेत.

५. उपरोक्त बदल्या ह्या संबंधितांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी पदग्रहण अवधी तसेच कोणत्याही प्रकारचा प्रवास भत्ता अथवा अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या संबंधित अधिकारी ते बदली झालेल्या कार्यालयात रूजू झाले आहेत किंवा कसे, याची माहिती तात्काळ शासनास सादर करण्याबाबत संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००११५१६४४८२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.10.01 16:11:12 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सर्व संबंधित उपअभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.

**प्रत-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
६. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर, अमरावती, औरंगाबाद,नाशिक, पुणे, कोकण.
७. कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद (सर्व)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित सर्व जिल्हे.
९. निवडनस्ती कार्यासन, पापु-१५